**सामाजिक अंकेक्षण संचालनालयाच्या नविन प्रशासन भवन,**
**९ मजला येथील पश्चिम बाजूकडील कार्यालयाच्या**
**नुतनिकरणास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मग्रारो -२०१७/प्र.क्र.०४/रोहयो-६अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- १६ मे, २०१७

<u>वाचा</u> :- सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रं. शाकाजा-१११५/प्र.क्र.२०१८/२०१५/२२,
दिनांक २४ फेब्रुवारी २०१६.

<u>प्रस्तावना :-</u>

सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २४ फेब्रुवारी २०१६ च्या शासन निर्णयान्वये नविन प्रशासन भवन ९ वा मजला (प्रश्चिम बाजु) येथील १०८७ चौ.फूट जागा नियोजन (रोहयो) विभाग यांना सामाजिक अंकेक्षण संचालनालयाच्या कार्यालयाकरिता वाटप करण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने बैठक व्यवस्था व त्यासोबत विभागाच्या बैठकीसाठी सभागृह असे नियोजन करुन नुतनिकरणासाठी येणा-या खर्चाचे अंदाज पत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाकडून प्राप्त करुन घेण्यात आले. कार्यकारी अभियंता ईलाखा शहर विभाग, मुंबई यांनी रु. ३९,९१०००/-(रु. एकोणचाळीस लाख एक्यान्नव हजार फक्त) इतक्या रक्कमेचे खर्चाचे अंदाज पत्रक सादर केले आहे. सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय तसेच वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नविन प्रशासन भवन, ९ वा मजला (पश्चिम बाजु) येथील (नगर विकास विभाग, सा.प्र.वि.व सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागांची) १०८७ चौ. फूट जागेचे नुतनिकरणाचे काम करण्याकरिता कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई यांनी सादर केलेल्या रु. ३९,९९,०००/-(रु. एकोणचाळीस लाख नव्यान्नव हजार फक्त) इतक्या खर्चाच्या सादर केलेल्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर नुतनिकरणाचे काम करताना खालील अटींचे पालन करणे अनिवार्य राहिल.

क. नव्याने करण्यात येणारे फर्निचर व लाकडी दुभाजक तसेच इतर लाकडी सामान हे आग प्रतिबंधक प्रक्रिया केलेले असावे.

ख. प्लोअरिंग काम करत असताना ८ व्या मजल्यावर पाण्याची गळती होणार नाही याची दक्षता घ्यावी.

ग. इमारतीच्या मूळ संकल्पचित्र आराखडयात कोणतेही बदल करु नयेत अथवा त्यांना हानी पोहचणार नाही याची दक्षता घ्यावी.

३. सदरचा खर्च सामाजिक अंकेक्षण संचालनालयासाठी देय असलेल्या ०.५% निधीतून भागविण्यात यावा.

४.उपरोक्त रकमेचा धनादेश, " Executive Engineer, Presidency Division, Mumbai " यांचे नावे काढण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग व नियोजन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५१६१५५९४५२४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashwini Bhimrao Yamgar

Digitally signed by Ashwini Bhimrao Yamgar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dac7751ba6c9f2da6700fa9e55e294a8a5612649e9caeeaaf7753cf63fed1ca, cn=Ashwini Bhimrao Yamgar
Date: 2017.05.20 11:18:21 +05'30'

**( अश्विनी यमगर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) प्रधान सचिव (वित्त) व सचिव (लेखा व कोषागारे) वित्त विभाग मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) सचिव (रोहयो) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई.
६) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई.
७) आयुक्त, मगांराग्रारोहयो, आयुक्तालय, नागपूर
८) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
९) निवडनस्ती, मग्रारो-६ अ, नियोजन विभाग, मंत्रालय, -३२.